GR-200404091418350001-0100

**विशेष मागास प्रवर्गाकरीता शासकीय निमशासकीय सेवेत आरक्षण.......**

**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्रमाकः- बीसीसी २०००/३१०२/ प्र.क्र.३/२००२/१६ब,
मंत्रालय,मुंबई ४०० ०३२
दिनांक :- २० मार्च २०००२

संदर्भ :- १) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग, क्र.सीडीआर-१०९३/१०७७/प्र.क्र. ९३/११, दिनाक १२ ऑक्टोबर,१९९३.
२) शासन निर्णय, समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग क्र.सीबीसी-१४९४/प्र.क्र.२३६/मावक-५, दि.१३ जून १९९५
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.बीसीसी १०९४/प्र.क्र.६८/९४/१६ब, दि.१५ जून १९९५.
४) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग, क्र.सीडीआर १०९५/९९५/प्र.क्र.३/९६/११, दि.३१ ऑक्टोबर १९९६ .

## शासन परिपत्रक

**शासन परिपत्रक** :- शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दि.१५ जून १९९५ अन्वये अनुसूचित जमातीच्या प्रमाणपत्राच्या आधारे शासकीय/निमशासकीय सेवेत प्रवेश मिळविला आहे अथवा पदोन्नती मिळविली आहे अशा व्यक्तीना सेवेतून काढून टाकू नये अथवा पदावनत करु नये असे संरक्षण देण्यात आले आहे. या शासन निर्णयात देण्यात आलेले संरक्षण दिनाक १५ जून १९९५ या दिनांकापर्यन्त मर्यादित असून या दिनांकानंतर सेवेत अनुसूचित जमातीच्या प्रमाणापत्राच्या आधारे नियुक्त झालेल्या उमेदवारांव्यतिरिक्त अन्य उमेदवाराना उपरोक्त शासन निर्णयान्वये देण्यात आलेले संरक्षण लागू होत नाही. शासनाचे याबाबतचे निर्णय/आदेश सूस्पष्ट असून त्यामध्ये अद्याप कोणतेही बदल झालेले नाहीत.

**शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, दिनांक १५ जून १९९५ च्या शासन निर्णयासारखाच एक बनावट शासन निर्णय काही हितसंबंधीताकडून शासनव्यवहारात आणल्याचे आढळून आले आहे. हा शासन निर्णय" क्रमांक बीसीसी १३९४/प्र.क्र.६८/९४/१६-ब, दि.१५ मार्च २००० "असा क्रमांकित असून त्यामध्ये शेवटच्या परिच्छेदातील सुरुवातीस दिनांक १४ जुलै १९९८ पूर्वी असा उल्लेख करून त्यांना पदावनत करु नये असा समारोप करण्यात आलेला आहे. तसेच हा शासन निर्णय श्री.श.र.काळे, प्रधान सचिव,महाराष्ट्र शासन या नावाने निर्गमित झालेला आहे. हा शासन निर्णय पूर्णपणे बनावट असून अशाप्रकारचे कोणतेही आदेश शासनाने निर्गमित केलेले नाहीत.** या बनावट शासन निर्णयाची सर्व विभाग प्रमुखांनी गांभिर्याने दखल घेऊन या शासन निर्णयाच्या(म्हणजेच क्रमांकःबीसीसी १३९४/प्र.क्र.६८/९४/१६ब, दिनाक १५ मार्च २००० च्या बनावट शासन निर्णयाच्या )आधारे शासन सेवेत प्रवेश मिळविला असेल अथवा पदोन्नती मिळविली असेल अशा कर्मचारी/अधिका-याविरुध्द शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-सीडीआर १०९४/१३/१०७७/९३/११, दिनांक १२ऑक्टोबर,१९९३ व शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग,

क्रमांक-सीडीआर-१०९५/९९५/प्र.क्र.३/९६/११, दि.३१ ऑक्टोबर, १९९६ अन्वये दिलेल्या आदेशानुसार तात्काळ कारवाई सुरु करावी .

हे आदेश सर्व मंत्रालयीन विभागाना त्यांच्या अधिपत्याखालील विभागप्रमुख/कार्यालय प्रमुखांच्या निदर्शनास तात्काळ आणावेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

जी.के.राऊत
शासनाचे अवर सचिव.

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री /राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव/अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
* प्रबंधक,उच्च न्यायालय,मूळ शाखा,मुंबई,
* प्रबंधक,उच्च न्यायालयस,अपील शाखा,मुंबई,
* प्रबंधक,लोकायुक्त आणि उप लोकायुक्त यांचे कार्यालय,मुंबई
* सचिव,महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई,
अध्यक्ष जिल्हा निवड मंडळे ,
संचालक, समाजकल्याण, पुणे,
आयुक्त, आदिवासी विकास,नाशिक,
संचालक, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था,पुणे,
संचालक, सेवायोजन,मुंबई
सर्व मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सामान्य प्रशासन विभाग/ सर्व कार्यासने,
निवड नस्ती.

* पत्राने.